**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात केंद्र पुरस्कृत "व्याघ्र प्रकल्प" या योजनेकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२२/प्र.क्र.१६/का-६.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २५ मे, २०२३.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.
२) वन विभागाची नस्ती क्र.डब्लुएलपी ०३.२३/प्र.क्र.१०६/भाग-२/फ-१.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत वन विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत **"व्याघ्र प्रकल्प आवर्ती व अनावर्ती"** या योजनांतर्गत अनुसूचित जमाती घटकाकरीता सन २०२२-२३ मध्ये प्राप्त झालेला केंद्र/राज्य हिश्याचा निधी वितरीत करण्यास व SNA खात्यातील जमा अखर्चित निधी खर्च करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र.२ अन्वये वित्त विभागास करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून निधी वितरीत करण्याची व SNA खात्यातील अखर्चित निधीमधून निधी खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत मागणी क्र.टी-५ मधील २४०६-वनीकरण व वन्यजीव या मुख्य लेखाशिर्षांतर्गत केंद्र पुरस्कृत "व्याघ्र प्रकल्प आवर्ती व अनावर्ती" या योजनांतर्गत अनुसूचित जमाती घटकाकरीता सन २०२२-२३ मध्ये प्राप्त झालेला केंद्र/राज्य हिश्याचा निधी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील तरतुदींतून खालीलप्रमाणे वितरीत करण्यास व SNA खात्यातील अखर्चित निधीमधून निधी खर्च करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :-

(रु. लाखात)

| लेखाशिर्ष | बाब क्रमांक | सन २०२३-२४ साठी अर्थसंकल्पित तरतूद | SNA खात्यात अखर्चित निधीतून खर्चास मान्यता दयायचा निधी | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| **अनावर्ती** | ३१, सहायक अनुदाने, (वेतनेतर) | | | |
| केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०६ ए९८२) | | ७०६.९७ | ३५.२२७ | ७४.७२८ |
| राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २४०६ ए९९१) | | १८७.९९ | २३.४८४६७ | ४९.८१८६७ |
| **एकूण अनावर्ती** | | **८९४.९६** | **५८.७११६७** | **१२४.५४६६७** |
| **आवर्ती** | | | | |
| केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०६बी००२) | | ४८३.९७ | ०.०० | ८७.१९१ |
| राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २४०६बी०११) | | १८८.९७ | ०.०० | ८७.१९१ |
| **एकूण आवर्ती** | | **६७२.९४** | **०.००** | **१७४.३८२** |
| **एकूण अनावर्ती व आवर्ती** | | **१५६७.९०** | **५८.७११६७** | **२९८.९२८६७** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.२९८.९२८६७ लाख (अक्षरी रुपये दोन कोटी अठ्ठयाण्णव लाख ब्याण्णव हजार आठशे सदुसष्ट फक्त) इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, वन विभाग** यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. तसेच SNA खात्यातील अखर्चित निधीतून रु.५८.७११६७ लाख इतका निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४८६/२०२३-व्यय-१४, दि.२८.०४.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून तसेच वित्त विभाग दि.१२.०४.२०२३ रोजीच्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२३०५१५१६४१३३६५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, pseudonym=4D88F77C99929CC895AC64CF186BB11E7252442D, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2023.05.25 18:26:30 +05'30'

**( किरण कि. पवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/ नागपूर/ अमरावती.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. वित्त विभाग ( अर्थोपाय /अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
९. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.